**माझी वसुंधरा अभियान २.० अंतर्गत प्राप्त बक्षीस रकमेतून हाती घ्यावायच्या कामांसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास (DPR) प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. अहिल्यानगर महानगरपालिका**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अभियान-२०२४/प्र.क्र.०४(८९)/तां.क.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
**दिनांक:२६ मे, २०२५**

**वाचा:**

(१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान-२०२२/प्र.क्र.१२०/ तां. क.१ दिनांक ५ डिसेंबर, २०२२
(२) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान-२०२१/प्र. क्र. ५७/ तां. क्र. १, दिनांक ८ फेब्रुवारी, २०२२
(३) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान/२०२१/प्र. क्र.५७(२)/ तां. क्र. १, दिनांक ११ ऑक्टोबर, २०२३
(४) प्रशासकीय मान्यता देण्यासाठी गठीत समितीच्या दिनांक ०२ मे, २०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
(५) आयुक्त, अहिल्यानगर महानगरपालिका यांचे पत्र क्र.जा.नं.सा.बा.वि.५०१८/२४-२५ दिनांक २५ सप्टेंबर, २०२४

**प्रस्तावना :**

माझी वसुंधरा अभियान २.० मधील ५ गटातील विजेत्या स्थानिक स्वराज्य संस्थांना रोख रकमांची पारितोषिके व सदर बक्षीस रकमेच्या विनियोगाची कार्यपध्दती संदर्भीय क्रमांक (१) येथील दिनांक ५ डिसेंबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आली आहे. त्यानुसार, स्थानिक स्वराज्य संस्थांनी पारितोषिकाच्या रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून, त्यास संदर्भीय क्रमांक (२) येथील दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित समितीकडून प्रशासकीय मान्यता घ्यावयाची आहे.

२. त्यानुसार, माझी वसुंधरा अभियान २.० अंतर्गत अहिल्यानगर महानगरपालिकेस प्राप्त होणाऱ्या रु. १.५० कोटी बक्षीस रकमेतून हाती घ्यावयाच्या कामाचा रु. १,५०,५३,३८७.०० किमतीच्या रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल आयुक्त, अहिल्यानगर महानगरपालिका यांनी शहर अभियंता, अहिल्यानगर महानगरपालिका यांची तांत्रिक मान्यता घेऊन सादर केला होता. सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास संदर्भीय क्र.(३) दिनांक ११ ऑक्टोबर, २०२३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये

सोबतच्या **जोडपत्र-१** मध्ये दर्शविल्यानुसार शहरातील विविधी ठिकाणी रू. १,०२,७०,६६०/- (रुपये एक कोटी दोन लक्ष सत्तर हजार सहाशे साठ फक्त) (GST 18%, Labour Insurance १% व Royalty इत्यादि वगळून) किंमतीची वृक्ष लगावडीच्या कामांचा समावेश आहे.

३. प्रशासकीय मान्यतेनंतर सदर काम सुरू करताना महानगरपलिकेच्या असे लक्षात आले की, मंजूर सविस्तर प्रकल्प अहवालामधील नमूद केलेल्या जागा या रहिवासी भागातील असल्याने तेथे संपूर्ण जागेवर वृक्ष लागवड करणे शक्य नाही. तसेच सदर जागेचा वापर रहिवासी नागरिक विविध समारंभ व खेळण्या करीता करीत आहेत. त्यामुळे सदर सर्व ठिकाणी वृक्ष लागवड करणे शक्य नाही. यास्तव, आयुक्त, अहिल्यानगर महानगरपालिका यांनी सदर कामे रद्द करून या कामांच्या ऐवजी हाती घ्यावयाच्या कामांचा रु. १,२०,१७,४३२.३४ (रुपये एक कोटी वीस लक्ष सतरा हजार चारशे बत्तीस आणि चौतीस पैसे) रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल शहर अभियंता, अहिल्यानगर महानगरपालिका यांची तांत्रिक मान्यता घेऊन सादर केला आहे. मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०२ मे, २०२५ रोजी झालेल्या बैठकीत स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालावर चर्चा होवून समितीने शिफारशी केल्या आहेत. समितीने केलेल्या शिफारशीनुसार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून माझी वसुंधरा अभियान २.० अंतर्गत अहिल्यानगर महानगरपालिकेस प्राप्त झालेल्या बक्षिस रकमेमधून हाती घ्यावयाच्या सुधारित कामांचा रू. १,२०,१७,४३२.३४ (रुपये एक कोटी वीस लक्ष सतरा हजार चारशे बत्तीस आणि चौतीस पैसे) रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल आयुक्त, अहिल्यानगर महानगरपालिका यांनी शहर अभियंता, अहिल्यानगर महानगरपालिका यांची तांत्रिक मान्यता घेऊन सादर केला आहे. सदर प्रस्ताव मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या समितीच्या दिनांक ०२ मे, २०२५ रोजी झालेल्या बैठकीत विचारात घेण्यात आला. सदर समितीने केलेल्या शिफारशीनुसार, अहिल्यानगर महानगरपालिकेने सादर केलेल्या सुधारित प्रस्तावानुसार संदर्भीय क्रमांक (३) येथील दिनांक ११ ऑक्टोबर, २०२३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली सोबतच्या **जोडपत्र-१** मध्ये दर्शविण्यात आलेली कामे रद्द करण्यास व रू. १,२०,१७,४३२.३४ (रुपये एक कोटी वीस लक्ष सतरा हजार चारशे बत्तीस आणि चौतीस पैसे) रकमेच्या सुधारित सविस्तर प्रकल्प अहवालास खालील अटी व शर्तीच्या अधिन शासन प्रशासकीय मान्यता देत आहे. प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत असलेली कामे सोबतच्या **जोडपत्र-२** मध्ये दर्शविण्यात आली आहेत.

**२. अटी व शर्ती:**

१) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांसाठी कार्यान्वयन यंत्रणा अहिल्यानगर महानगरपालिका राहील.

२) सदर सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद केलेल्या कामांच्या अंमलबजावणीचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत माझी वसुंधरा अभियान संचालनालयास पाठविण्यात यावा.

३) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील कामांची अंमलबजावणी प्रशासकीय मान्यता मिळाल्यापासून पुढील ६ महिन्यात पूर्ण करावी.

४) बक्षीस रकमेपेक्षा अधिकचा खर्च झाल्यास तो स्वनिधी मधून करण्यात यावा.

५) सदर सविस्तर प्रकल्प अहवालातील मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास, त्यासाठी कोणताही वाढीव निधी / अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०५२६१६३३३६३१०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAHEEN SHOUKAT JAMADAR

Digitally signed by SHAHEEN SHOUKAT JAMADAR
Date: 2025.05.26 17:11:04 +05'30'

**(शाहीन शौ. जमादार)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
२) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
४) मा. मंत्री, पर्यावरण व वतावरणीय बदल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२
५) मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
८) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग
९) जिल्हाधिकारी, अहिल्यानगर
१०) आयुक्त, अहिल्यानगर महानगरपालिका
११) निवडनस्ती तां.क.१

# *जोडपत्र- १*

शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक:अभियान-२०२४/प्र. क्र.०४(८९)/तां. क.१ दिनांक: २६ मे, २०२५ चे सहपत्र

(शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्र. अभियान/२०२१/प्र. क्र.५७(२)/ तां. क्र. १, दिनांक ११ ऑक्टोबर, २०२३ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांपैकी **खालील कामे रद्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे**.)

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | अंदाजपत्रकिय खर्च रू. |
|---|---|---|
| १ | Garden development at Jadhav Nagar, Vadgaon Gupta Road | ६,५०,१७५.०० |
| २ | Garden development at Ria Park, Kalyan Road | ५,५७,५२४.०० |
| ३ | Miyawaki Garden at Buradgaon Kachara depot | ९,२८,४६८.०० |
| ४ | Amrut Van Garden at Samarthnagar water tank | ३,६८,१४३.०० |
| ५ | Smruti Udyan at Nanajinagar | ३,४३,०९८.०० |
| ६ | Butterfly Garden at Raj-Jyoti Nagar | ६,२०,७१७.०० |
| ७ | Public Garden Development Vaujabai Colony Pipeline Road | ८,३७,६८१.०० |
| ८ | Garden development at Vittal-Rukhamini Mandir | १७,०८,१९३.०० |
| ९ | Garden development at Nilshankar Colony | १०,५९,६६७.०० |
| १० | Plantation at Bhistbag Mahan Parisar | १३,५०,१९०.०० |

## *जोडपत्र- २*

शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक:अभियान-२०२४/प्र. क्र.०४(८९)/तां. क.१
दिनांकः २६ मे, २०२५ चे सहपत्र

**मंजूरी देण्यात येत असलेली कामे**

| Sr. No. | Description of Work | Estimated Cost in Rs. |
|---|---|---|
| १ | Tree plantation at Sr. No. १७०/१,२,३ Sewage treatment plant of AMC at Wakodi | ४३,५२,४२६.१३ |
| २ | Tree plantation at Sr. No. २८९ Savedi Kachara Depo, Savedi | ४३,९५,५८३.६१ |
| ३ | Tree plantation at Buradgaon Kachara Depot | १४,६९,४२२.६० |
| **Total Amount (Rs)** | | **१,२०,१७,४३२.३४** |